**सन २०२३-२४ या कालावधीत राज्यातील शासकीय धान्य गोदामांमध्ये अन्नधान्याची पोती शिवण्यासाठी लागणाऱ्या वाढीव सुतळीगाठीची खरेदी करण्यास प्रशासकीय मंजुरी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सामुग्री-४५२३/प्र.क्र. १६५/ना.पु.१६-ब,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: ०७ मार्च, २०२४.

संदर्भ : १. शासन निर्णय समक्रमांक : सामुग्री-४५२३/प्र.क्र. १६५/ना.पु.१६-ब ,दि. ०५ सप्टेंबर २०२३.
२. शासन शुद्धीपत्रक समक्रमांक: सामुग्री-४५२३/प्र.क्र. १६५/ना.पु.१६-ब ,दि. २४. नोव्हेंबर २०२३
३. शासन शुद्धीपत्रक समक्रमांक : सामुग्री-४५२३/प्र.क्र. १६५/ना.पु.१६-ब ,दि.२८. नोव्हेंबर २०२३
४. शासन निर्णय समक्रमांक: सामुग्री-४५२३/प्र.क्र. १६५/ना.पु.१६-ब, दि. ०५ जानेवारी २०२४
५. उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. भाखंस-२०१४/प्र.क्र.८२/ भाग-iii/ उद्योग-४, दि.०१.१२.२०१६

**प्रस्तावना :-**

राज्यातील ज्या शासकीय धान्य गोदामांमध्ये वीज उपलब्ध असूनही लोडशेडिंग किंवा अन्य कारणांमुळे वीज पुरवठा खंडित झाला असता किंवा पोती शिवणयंत्र नादुरुस्त झाल्यास शासकीय धान्य गोदामांमध्ये अन्नधान्याच्या प्रमाणीकरणानंतर पोती शिवण्यासाठी एक वर्षाच्या (२०२३-२४) कालावधीसाठी लागणाऱ्या ५,२८,६४७ किलो म्हणजेच १०,५७.२९४ युनिट्स सुतळीगाठी GeM पोर्टलद्वारे ऑनलाईन निविदा पध्दतीने खरेदी करण्यास संदर्भाधिन क्र. १ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. उक्त अनुषंगाने GEM पोर्टलवर कार्यान्वित करण्यात आलेल्या निविदाप्रक्रियेत एल-१ निविदाकार ठरलेल्या BUSINET-INFINITY INDIA PRIVATE LIMITED या निविदाकाराकडून खरेदी करण्यास व त्यानुषंगाने प्रति किलो रु.४१० या दराने येणाऱ्या एकूण रु. २१,६७,४५,२७०/- इतक्या खर्चास विभागीय भांडार खरेदी समितीच्या दि. २० आक्टोंबर, २०२३ रोजीच्या बैठकीत मान्यता देण्यात आली. सदर खर्चास शासन निर्णय दि.०५.०१.२०२४ अन्वये सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे.

परंतु सद्यस्थितीत वीज उपलब्ध असूनही लोडशेडींग किंवा अन्य कारणामुळे वीज पुरवठा खंडीत झाला असल्यास किंवा पोती शिवणयंत्र बंद पडण्याच्या कालावधीत शासकीय धान्य गोदामात अन्नधान्यांच्या पोत्यांचे प्रमाणीकरण करण्यासाठी क्षेत्रीय कार्यालयांनी २,४३,९०२ किलो म्हणजेच ४,८७,८०४ युनिट्स इतक्या सुतळीगाठींची मागणी शासनास सादर केलेली आहे. त्यानुषंगाने क्षेत्रीय कार्यालयांनी केलेली मागणी व उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय दि.०१.१२.२०१६ मधील

पुनर्प्रत्ययी आदेश देण्याबाबतच्या तरतुद विचारात घेऊन दि.२५.०१.२०२३ रोजी आयोजित केलेल्या विभागीय भांडार खरेदी समितीने यापुर्वीच्या निविदाप्रक्रियेतील एल-१ निविदाकार ठरलेल्या BUSINET-INFINITY INDIA PRIVATE LIMITED या निविदाकाराकडून खरेदी करण्यास व त्यानुषंगाने प्रति किलो रु.४१०/- (यापूर्वीचाच खरेदी दर) या दराने सुतळीगाठी खरेदी करण्याबाबतचा निर्णय घेतला आहे. त्यानुषंगाने क्षेत्रीय कार्यालयांस २०२३-२४ या कालावधीतच आवश्यक असलेल्या २,४३,९०२ किलो म्हणजेच ४,८७,८०४ युनिट्स सुतळीगाठी खरेदी करण्यास प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय** :

राज्यातील ज्या शासकीय गोदामांमध्ये वीज पुरवठा उपलब्ध असूनही लोडशेडिंग किंवा अन्य कारणांमुळे वीज पुरवठा खंडित झाला असल्यास किंवा पोती शिवणयंत्रे बंद पडण्याच्या कालावधीत या सोबतच्या परिशिष्ठ "अ" मध्ये नमूद केलेल्या जिल्ह्यातील शासकीय धान्य गोदामांमध्ये अन्नधान्याच्या प्रमाणीकरणासाठी २,४३,९०२ किलो सुतळी गाठी खरेदीसाठी GEM पोर्टलवर यापुर्वी कार्यान्वित करण्यात आलेल्या निविदाप्रक्रियेत एल-१ निविदाकार ठरलेल्या BUSINET-INFINITY INDIA PRIVATE LIMITED या निविदाकाराकडून खरेदी करण्यास व त्यानुषंगाने प्रति किलो रु.४१० या दराने येणाऱ्या एकूण रु.९.९९,९९,८२०/- (अक्षरी रुपये नऊ कोटी नव्याण्णव लाख नव्याण्णव हजार आठशे वीस फक्त) इतक्या वाढीव खर्चास या आदेशांद्वारे प्रशासकीय मान्यता (पुनप्रर्त्ययी आदेश) प्रदान करण्यात येत आहे.

२. प्रस्तावांतर्गत सुतळीगाठी खरेदीच्या अनुषंगाने यापुर्वी निर्गमित केलेल्या संदर्भ क्र.१ ते ४ येथील शासन निर्णय व शासन शुद्धीपत्रकातील अटी-शर्तीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत असल्याने सदर शासन निर्णयातील अटी-शर्तीचे काटेकोरपणे पालन करणे बंधनकारक राहील.

३. संदर्भ क्र.१ येथील दि.१३ जानेवारी, २०२२ रोजीच्या शासन निर्णयामध्ये अनामत रक्कम (Security Deposit) या मथळ्याखाली पुरवठादारास उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दि. १ डिसेंबर, २०१६ रोजीच्या शासन निर्णयासोबतच्या नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्र.४.६ मधील तरतूदीनुसार खरेदी मुल्याच्या ३% अनामत रक्कम करारनाम्यासोबत धनाकर्षाद्वारे गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) या पोर्टलवरील तरतुदीनुसार वित्तीय सल्लागार व उपसचिव यांचे नावे जमा करावी लागेल, अशी तरतूद आहे. तथापि, यशस्वी पुरवठादाराने सदर अनामत रक्कम EPBG द्वारे Online भरुन त्याची पावती उपरोक्त शासन निर्णय दिनांक ०५ सप्टेंबर, २०२३ मध्ये निश्चित केलेल्या Secondary Buyer (छायांकित प्रत) व P.A.O/D.D.O. यांच्याकडे सादर केलेली आहे. त्यामुळे वेगळ्याने अनामत रक्कम धनाकर्षाद्वारे स्वीकारण्याची आवश्यकता नाही.

४. संदर्भ क्र.१ मध्ये नमूद शासन निर्णय ०५ सप्टेंबर,२०२३ च्या परिच्छेद क्र. (८) गध्ये पुरवठादार व खरेदीदारांची जबाबदारी याबाबत स्वयंस्पष्ट तरतुदी नमूद केलेल्या आहेत. सदर तरतुदींचे काटेकोरपणे पालन करणे आवश्यक राहील.

५. सदर आदेश शासन निर्णय अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या शासन निर्णय क्र.स्वका-१०९८/५६७/प्र.क्र.२३३८/नापु-१२, दि.३० नोव्हेंबर, १९९८, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग-२, उपविभाग-४, अ.क्र.१५ व २७ अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या शक्तींचा वापर करून तसेच विभागीय भांडार खरेदी समितीच्या दि.२५.०१.२०२३ रोजी झालेल्या बैठकीत दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहेत.

६. केंद्रशासनाने दि.२७ मे.२०२२ व दि.३१ मे,२०२२ च्या पत्रानुसार राष्ट्रीय अन्न सुरक्षा योजना ही SNA म्हणून घोषित केलेली आहे. त्यानुषंगाने विभागाने राष्ट्रीय अन्न सुरक्षा योजनेकरीता ICICI बँकेत SNA खाते कार्यान्वित कलेले असून माहे. ऑगष्ट, २०२३ पासून राष्ट्रीय अन्न सुरक्षा योजनेचे सर्व अनुषंगिक खर्चाचं प्रदाने SNA खात्यातुन करण्यात येत आहे. सबब, उपरोक्त प्रकरणी सुतळी गाठीचे प्रदाने बँक -: ICICI मुंबई-फोर्ट, खाते क्रमांक: ६२३५०११८०२९०, IFSC Code : ICICI ०००६२५ या SNA खात्यातून करण्यात यावीत.

७. **सदर प्रस्तावास अनौपचारीक संदर्भ** क्र.८७/व्यय-१०,दि.२२ फेब्रवारी, २०२४ अन्वये **वित्त विभागाने मान्यता दिलेली आहे.**

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०३०७१८५११५३५०६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJASHREE RAHUL SARANG

Digitally signed by RAJASHREE RAHUL SARANG
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=5c072530c0f2940404764b5dc00127bb99ecf9466431dc1a1a4e123b229e41c0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2B9A36FAE4EC39263A2A8DF78B48FC28B92B165E239815B0CDCEF1A4B5928579, cn=RAJASHREE RAHUL SARANG
Date: 2024.03.07 19:01:26 +05'30'

**( राजश्री सारंग )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रति**

१) मा.मंत्री, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
२) मा. मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा / विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
३) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४) विकास आयुक्त(उद्योग), उद्योग संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
५) सर्व विभागीय आयुक्त,
६) नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई.
७) संचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई
८) सर्व उपायुक्त (पुरवठा), विभागीय आयुक्त, कार्यालय
९) सर्व जिल्हाधिकारी (मुंबई व मुंबई उपनगर जिल्हा वगळून)
१०) सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी
११) वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.

१२) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
१३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
१४) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
१५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
१६) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, नागरी पुरवठा, लेखा परीक्षा परिमंडळ द्वारा: वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
१७) वित्त विभाग ( व्यय ४), मंत्रालय, मुंबई.
१८) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय,मुंबई.
१९) बिझीनेट इन्फिनिटी इंडिया प्रा.लि.मुंबई
२०) निवड नस्ती/नापु-१६ब.

परिशिष्ट "अ"

सुतळी गाठींचा पुरवठा करण्यासाठी संबधित क्षेत्रीय कार्यालयाकडून प्राप्त माहिती दर्शविणारा तक्ता

| राज्यातील वीज उपलब्ध नसलेल्या शासकीय धान्य गोदामांमध्ये अन्नधान्याच्या पोती प्रमाणीकरण करण्यासाठी सन २०२३-२४ या कालावधीसाठी आवश्यक वाढीव सुतळीगाठींची संख्या (किलो) | | |
|---|---|---|
| अ.क्र. | जिल्हा | आवश्यक सुतळींची संख्या KG |
| १ | जिल्हा पुरवठा अधिकारी, नाशिक | २०७६० |
| २ | जिल्हा पुरवठा अधिकारी, धुळे | २०००० |
| ३ | जिल्हा पुरवठा अधिकारी, नंदुरबार | १७४७८ |
| ४ | जिल्हा पुरवठा अधिकारी, जळगांव | ६८१० |
| ५ | जिल्हा पुरवठा अधिकारी, अहमदनगर | ३८२०४ |
| ६ | जिल्हा पुरवठा अधिकारी, अमरावती | १९११० |
| ७ | जिल्हा पुरवठा अधिकारी, अकोला | ७५०० |
| ८ | जिल्हा पुरवठा अधिकारी, बुलडाणा | २९४४० |
| ९ | जिल्हा पुरवठा अधिकारी, यवतमाळ | १७४०० |
| १० | जिल्हा पुरवठा अधिकारी, वाशिम | १०८०० |
| ११ | जिल्हा पुरवठा अधिकारी, नागपूर (श.) | १०५०० |
| १२ | जिल्हा पुरवठा अधिकारी, नागपूर ( ग्रा.) | १५६०० |
| १३ | जिल्हा पुरवठा अधिकारी, वर्धा | ३००० |
| १४ | जिल्हा पुरवठा अधिकारी, चंद्रपूर | १२३०० |
| १५ | जिल्हा पुरवठा अधिकारी, गडचिरोली | १५००० |
| एकूण | | २४३९०२ |

RAJASHREE RAHUL SARANG

Digitally signed by RAJASHREE RAHUL SARANG
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=5c072530c0f2940404764b5dc00127bb99ecf9466431dc1a1a4e123b229e41c0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2B9A36FAE4EC39263A2A8DF78B48FC28B92B165E239815B0CDCEF1A4B5928579, cn=RAJASHREE RAHUL SARANG
Date: 2024.03.07 19:01:48 +05'30'

( राजश्री सारंग )
शासनाचे उप सचिव

## परिशिष्ट-ब

(अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,
शासन निर्णय क्रमांक: सामुग्री-४५२३/प्र.क्र.१६५/ना.पु.१६-ब,
दिनांक : ०७ मार्च, २०२४ मधील परिच्छेद ६.४ नुसार द्यावयाचे प्रमाणपत्र)

प्रति,

नियंत्रक शिधावाटप व संचालक,
नागरी पुरवठा, चर्चगेट, मुंबई

विषय :- सुतळी गाठी जिल्ह्यासाठी प्राप्त झाल्याबाबतचे प्रमाणपत्र देणेबाबत.
संदर्भ :- शासन निर्णय क्र. सामुग्री-४५२३/प्र.क्र.१६५/ना.पु.१६-ब,
दिनांक: ०७ मार्च, २०२४

महोदय,

प्रमाणित करण्यात येते की, मेसर्स BUSINET-INFINITY INDIA PRIVATE LIMITED यांचेकडून या कार्यालयास दिनांक ------ रोजी ६०/५० किलो वजनाची एक गाठ याप्रमाणे ------ इतक्या सुतळी गाठी सुस्थितीत प्राप्त झाल्या आहेत. सदरची सुतळी गाठी आय.एस.आय. मार्क दर्जाची असल्याबाबत खात्री करण्यात आली आहे. करीता प्रमाणपत्र देण्यात येत आहे.

दिनांक : स्वाक्षरी/-

जिल्हा पुरवठा अधिकारी/ अन्नधान्य वितरण अधिकारी

गोल शिक्का